सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतीगृहातील कर्मचाऱ्यांच्या मानधनामध्ये वाढ करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०२१/प्र.क्र.१७/शिक्षण-२**
**मंत्रालय विस्तार , मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- १ फेब्रुवारी, २०२२**

<u>वाचा :-</u> सा.न्या. व वि.स. विभाग, शासन निर्णय, क्रमांक : बैठक-२०१७/प्र.क्र.३०८/शिक्षण-२ दिनांक ८ जुलै, २०१९

**प्रस्तावना :-**

मागासवर्गीय विद्यार्थ्यांना त्यांचा अभ्यासक्रम पूर्ण करता यावा, ग्रामीण भागामध्ये मागासवर्गीय विद्यार्थ्यांमधील शाळागळतीचे प्रमाण कमी व्हावे,आर्थिक दुरवस्थेमुळे मागासवर्गीय पालकांना त्यांच्या मुलांच्या शिक्षणात अडचणी येऊ नये आणि मागासवर्गीय विद्यार्थ्यांचा शैक्षणिक विकास व्हावा, या उद्देशाने सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत अनुदानीत वसतीगृहे चालविण्यात येतात. या अनुदानित वसतीगृहाच्या कर्मचाऱ्यांच्या मानधनामध्ये संदर्भाधीन दिनांक ८ जुलै, २०१९ च्या शासन निर्णयान्वये वाढ करण्यात आलेली आहे. वसतीगृह कर्मचाऱ्यांच्या मानधनात सन २०१९ पासून वाढ करण्यात न आल्याने संबंधीत वसतीगृह कर्मचारी संघटना तसेच लोकप्रतिनिधींमार्फत सातत्याने वसतीगृह कर्मचाऱ्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत शासनाकडे मागणी करण्यात येत होती. त्याअनुषंगाने विभागांतर्गत अनुदानित वसतीगृह कर्मचाऱ्यांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानीत वसतिगृहातील कर्मचाऱ्यांना मानधनात दिनांक १ जुलै, २०२१ पासून खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे वाढ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सद्यस्थितीत असलेले मानधन | सुधारीत मानधन |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक | रू.९,२००/- | रू.१०,०००/- |
| २ | स्वयंपाकी | रू.६,९००/- | रू.८,५००/- |
| ३ | मदतनीस | रू.५,७५०/- | रू.७,५००/- |
| ४ | चौकीदार | रू.५,७५०/- | रू.७,५००/- |

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं क्र.११३१/व्यय-१४, दिनांक २८.१२.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२२०२०११३१४३३९२२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2022.02.01 16:35:19 +05'30'

**( दि.रा. डिंगळे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
४. अ.मु.स. (सा.न्या.व वि.स.विभाग) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक
५. महालेखापाल ( महाराष्ट्र-१ व २) (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
७. अतिरीक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण (सर्व)
९. सहायक आयुक्त,समाज कल्याण (सर्व)
१०.जिल्हा समाज कल्याण अधिकारी,समाज कल्याण (सर्व)
११.निवडनस्ती (शिक्षण-२)